**शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, मर्या. नाशिक यांना राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांनी मंजूर केलेल्या कर्ज रक्कमेस शासन हमी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२००९/प्र.क्र.४१/अर्थबळ.

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- २२ जुलै, २००९.

__वाचा__ : १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शासन हमी-१०९९/ प्र.क्र.६८/शासन हमी, दिनांक ५ नोव्हेंबर,१९९९.
२) शासन निर्णय क्र.आविम-२०००/प्र.क्र.२९४/का-३, दिनांक २८.२.२००३.
३) शासन निर्णय क्र.आविम-२००८/प्र.क्र.१७६/का-३, दिनांक २९ मार्च, २००८.
४) भारत सरकार जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे क्र.डीओ-२००२५/१३/२००७/एसजी-२, दिनांक १४ डिसेंबर,२००७ चे पत्र.
५) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक-डीओ-एनएसएफडीसी/प्रोफार्मा/एमएएच/०१/९९५३/दिनांक ७ जानेवारी,२००८.
६) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचे पत्र क्र. शआविविम / प्रशा/प्रकल्प/ शासन हमी /३२०/०८/ दिनांक ११ /८/२००८.
७) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक-डीओ-एनएसएफडीसी/प्रोजे/एमएएच/जन/०९/६७०, दिनांक १९ मे, २००९.

__प्रस्तावना:-__ संदर्भाधीन अ.क्र.३ येथील दिनांक २९ मार्च, २००८ च्या शासन निर्णयान्वये शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने आदिवासी तरुणांसाठी स्वयंरोजगाराचे कार्यक्रम सुरु करण्यासाठी राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडून विविध व्यवसायांकरिता मुदत कर्ज मंजूर होण्यासाठी व त्यानुसार राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडून उपलब्ध होणाऱ्या एकूण **रु.२५.०० कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त)** इतक्या कमाल मर्यादेपर्यंतच्या कर्जास व त्यावरील व्याजास दिनांक ३१ मार्च, २०१० पर्यंत ठोकहमी देण्यात आली होती. शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडून वेळोवेळी घेतलेल्या कर्जामुळे शासन हमीची मर्यादा संपुष्टात आल्यामुळे जोपर्यंत सदर कर्जाकरीता शासन हमीची मर्यादा शासनाकडून वाढविण्यात येणार नाही तोपर्यंत राज्यातील आदिवासीकरीता एन.एस.टी.एफ.डी.सी., नवी दिल्ली पुरस्कृत कर्ज योजना राबविण्यासाठी पुढील निधी, सदर संस्थेकडून महामंडळास मंजुर करता येणार नाही असे एन.एस.टी.एफ.डी.सी. या संस्थेने उपरोक्त अ.क्र. ७ येथील दिनांक१९ मे, २००९ च्या पत्रान्वये कळविले आहे. **त्यानुसार शासन हमीची मर्यादा रु.२५.०० कोटीवरून रू. ५०.०० कोटी पर्यंत वाढवून देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.**

(कृ.मा.प.

**शासन निर्णय:-**

शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने आदिवासी बेरोजगार तरुणांसाठी स्वयंरोजगाराचे कार्यक्रम राबविण्यासाठी राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडे विविध व्यवसायांकरिता मुदत कर्ज उपलब्ध होण्यासाठी **महामंडळाने सादर केलेल्या** प्रस्तावानुसार **शासन हमीची मर्यादा रु.२५.०० कोटीवरून एकूण रू.५०.०० कोटी (रुपये पन्नास कोटी फक्त) पर्यंतच्या रकमेस (कर्ज व त्यावरील व्याज मिळून)** ठोक हमी देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सदर ठोक हमी रुपये ५०.०० कोटी दिनांक ३१ मार्च, २०१४ पर्यंत वैध राहील.

३. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळाबरोबर शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा.

अ) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडून ज्या प्रकल्पांना कर्ज मंजूरी दिलेली आहे, ते प्रकल्प व लाभार्थी वर्धनक्षम आहेत याची महामंडळाने खात्री करुन घ्यावी. तसेच राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यानी दिलेला कर्जाचा निधी ज्या प्रयोजनासाठी व अटीनूसार दिलेला आहे, त्यानुसार तो निधी विनियोगात आणावा.

ब) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्लीकडून घेतलेल्या कर्जाचे शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाकडून लाभार्थ्यांना वाटप केल्यानंतर लाभार्थ्यांमार्फत कर्जाचा योग्य विनियोग / व्यवसाय होतो किंवा कसे यावर शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ तसेच राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यानी लक्ष ठेवावे. त्यासाठी आवश्यक ती तपासणी करावी. यामध्ये कसूर केल्यास, सदर बाब शासनाच्या निदर्शनास आणावी व कर्ज वितरण तात्काळ बंद करावे.

क) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली, राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाकडून कर्ज फेडीस कसुरी झाल्यास कर्जाच्या वसुलीकरिता पुरेशा मत्तेची प्रतिभूती म्हणून घेतल्यानंतरच कर्ज मंजुरी करेल. तसेच सदर मत्तेची तपासणी वेळोवेळी व कमीतकमी ६ महिन्यातून करेल.

ड) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसुरीची शासनास ९० दिवसांच्या आंत सूचना देणे राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली (N.S.T.F.D.C. New Delhi) यांच्यावर बंधनकारक असेल.

ई) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाकडील कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्लीला हमीपूर्ततेकरीता शासन हमीची प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्लीकडून शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाच्या चल/अचल मालमत्तेची विक्री /लिलाव करुन वसुलीचा निर्णय झाल्यास त्याकरिता एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये आदिवासी विकास विभागाचा एक प्रतिनिधी व वित्त विभागाचा एक प्रतिनिधी घेण्यात यावा.

फ) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्लीकडील कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

ग) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली, शबरी महामंडळाच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल सोबत जोडलेल्या प्रपत्र-अमध्ये शासनास दर सहा महिन्यांनी (३०मार्च/३० सप्टेंबर) सादर करेल.

वरील (अ) ते (ग) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

४. शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळासाठी रु.५०.०० कोटीची ठोक-हमी अ.क्र.१ येथील शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक ५.११.१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहील :-

अ) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ हे Principal Debtor राहील.

ब) देय व्याज, हमी शुल्क तसेच अधिपरिव्यय (Over head cost) याची पूर्णपणे वसुली होऊ शकेल अशा दराने व्याज आकारणी शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ लाभार्थ्यांना कर्ज वाटप करताना करेल.

क) वरीलप्रमाणे ज्या लाभार्थ्यांना कर्ज देण्यात येते त्या लाभार्थ्यांची पतयोग्यता व योग्य प्रतिभूती यांची छानननी व खात्री करुन घेण्याची एक यंत्रणा शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ कार्यान्वित करेल. त्याचप्रमाणे कर्जफेडीत कसूरी झाल्यास कर्ज मंजूर / शिफारस करणाऱ्या अधिकाऱ्यांवर कारवाई करण्यात येईल व त्यांचे यासंबंधीचे अधिकार काढून घेण्यात येतील.

ड) ज्या जिल्हा / क्षेत्रात कर्जफेडीतील वसुलीचे प्रमाण समाधानकारक नसेल, अशा जिल्हा / क्षेत्रामध्ये नव्याने कर्ज मंजूर करता येणार नाही याची खात्री करुन घेण्यासाठी शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाकडून योग्य ती यंत्रणा कार्यान्वित करण्यात येईल.

इ) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने प्रत्येक वर्षाच्या सुरुवातीस राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडून उपलब्ध होणाऱ्या कर्जाबाबत आढावा घेऊन त्यासंबंधीच्या वित्तीय मर्यादा महामंडळाने शासनाकडून निश्चित करुन घ्याव्यात.

ई) राष्ट्रीय अनुसुचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडून शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक यांना मंजुर करण्यात आलेल्या प्रत्येक कर्जासंबंधीचा स्वतंत्र प्रस्ताव त्याबाबतच्या निविष्टी प्रपत्रासह **(Input Proforma)** महामंडळाने शासनाकडे मंजुरीसाठी पाठवावा. त्यानुसार सदर प्रस्तावास शासनस्तरावर हमी मंजुरी प्रदान करण्यात येईल.

फ) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडून ज्या प्रकल्पांना कर्ज मंजूरी दिलेली आहे, ते प्रकल्प वर्धनक्षम आहेत याची शबरी महामंडळाने खात्री करुन घ्यावी.

भ) लाभार्थ्यांना मंजूर केलेल्या कर्जाची वसूली वेळच्यावेळी परतफेडीच्या वेळापत्रकानुसार शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने करावी.

म) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्लीकडून अधिक कर्ज घेणार नाही.

य) **राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्लीने शबरी महामंडळाला मंजूर केलेल्या कर्जाच्या आदेशामध्ये नमूद केलेल्या परतफेडीच्या वेळापत्रकानुसार कर्जफेडीच्या शेवटच्या हप्त्याच्या दिनांकास हमी संपुष्टात येईल. सदर वेळापत्रकात नमूद केलेल्या विहित कालावधीसाठीच शासन हमी लागू राहील. या कालावधी नंतर राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्लीला शासन हमी आवाहनीत करता येणार नाही.**

र) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक यांनी दर तीन महिन्यांनी कर्ज मंजुर झालेल्या प्रकल्पाच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहीती आदिवासी विकास विभाग / वित्त विभागाकडे सादर करावी.

ल) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने लाभार्थ्यांकडील कर्ज वसुलीचा तसेच वित्तीय दायीत्वाचा अहवाल दर तीन महिन्यांनी आदिवासी विकास विभाग, वित्त विभागास न चुकता सादर करावा.

व) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने विहीत कार्यपध्दतीने लेखा परिक्षीत केलेल्या व संस्थेने मान्य केलेल्या संस्थेच्या लेख्याची एक प्रत प्रत्येक वर्ष संपल्यानंतर चार महिन्याच्या आत शासनास सादर करावी.

५. **हमी शुल्क**

अ) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास प्र.श.प्र.व. हमीशुल्काचा दर रु.२/- असा राहील. हे हमीशुल्क ज्या कालावधीकरीता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (total maximum outstanding amount) देय राहील.

ब) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यांनी वसुली करुन शासनाच्या खाती जमा करण्यास आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तीय वर्षाच्या ३१मार्च आणि / अथवा ३० सप्टेंबर, रोजी अदत्त असलेल्या घटना सापेक्ष दायित्वावर (Contingnt Liability) अनुज्ञेय असलेल्या हमी शुल्काचा भरणा १ एप्रिल आणि / अथवा १ ऑक्टोबर रोजी करावा.

क) राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली, शबरी महामंडळाकडून देय असलेल्या हमीशुल्काचा पहिला हप्ता वसुल करुन शासनास भरेल तद्नंतरच कर्जाचा पहिला हप्ता शबरी महामंडळास वितरीत करेल.

क) हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून प्रथम थकित हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जुन्या थकित हमी शुल्काची वसुली त्यानंतर त्यापेक्षा कमी जुन्या थकित हमी शुल्काची वसुली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

ड) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महामंडळाकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

इ) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने शासन हमी शुल्काची रक्कम "००७५-संकीर्ण, सर्वसाधारण सेवा-१०८-हमी शुल्क" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. आयुक्त आदिवासी विकास, नाशिक यांनी महामंडळाकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याची खात्री करुन घ्यावी.

ई) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची सांक्षाकित प्रत आदिवासी विकास विभागाने वित्त विभागास साक्षेपाने पाठवावी.

फ) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली शासनाकडे भरणा करेल व महामंडळाकडून वसूल करेल, अन्यथा शासन हमी अवैध ठरेल.

६. हा शासन निर्णय आदिवासी विकास विभाग,कार्यासन-३ यांच्या नस्ती क्र.आविम-२००८/प्र.क्र. ११८/का-३ वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा **शासन हमी क्रमांक**-०१ /२००९-२०१० यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली समवेत कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करार पत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता आदिवासी विकास विभागातील संबंधित उप सचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक:-**२००९०७२२१४०४५९००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( गो. डो. तायडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त आणि विकास महामंडळ, नवी दिल्ली.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र- १ / २ (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
उप मुख्य लेखापरीक्षक, नाशिक.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
वित्त विभाग (साउ /ऋण व हमी संनियंत्रण कक्ष) मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (का-१, ३, ६ व ७)आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
निवड नस्ती /अर्थबळ.

*****

# ANNEXURE A

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from: To**

**Guarantee & Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Toal Outstanding ( 1+ 2 ) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period ( 3 - 4 ) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance ( 5 - 6 ) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G . F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No. | | | |
| 5 | Balance at end of the period ( 1 - 2 ) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (I) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

( P.T.O.)

| | |
|---|---|
| **9** Types of inspection of assets / due diligency by lending institute during **last 6 months to ensure** loans are properly secured. | |
| **10**. Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the **Principal Debtor**<br>(II) Total Profits<br>(iii) % of profits as % of loan amount | |
| **11.** Is in the opinion of lending institute,the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| **12**. Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| **13.** If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| **14**. Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| **15.** Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |